**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील (खुद्द) कार्यरत अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अमुवा २०२२/प्र.क्र.३८/आस्था**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ मार्च, २०२३

वाचा:

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १८.०८.२०२२
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. अमुवा २०२२/प्र.क्र.४६/ आस्था, दि.१३.०९.२०२२
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. आस्था २०१७/प्र.क्र.१८२(भाग-१)/आस्था, दि.१८.०१.२०२२
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. आस्था २०१७/प्र.क्र.१८२(भाग-१)/आस्था, दि.१३.१०.२०२२
५) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. आस्था २०१७/प्र.क्र.१८२(भाग-१)/आस्था, दि.०३.११.२०२२
६) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. अमुवा २०२२/प्र.क्र.४६/ आस्था, दि.१४.११.२०२२
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.१८.०८.२०२२ च्या शासन निर्णयानुसार या विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील दि. १३.०९.२०२२ च्या शासन निर्णयान्वये ५४ मंजूर पदांपैकी ५२ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२२ ते २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली. संदर्भ क्र. ३ येथील दि.१८.०१.२०२२ च्या शासन निर्णयान्वये पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील ४५ नियमित पदे + बाह्ययंत्रणेद्वारे सेवा उपलब्ध करुन घ्यावयाची ०९ पदे अशा एकूण ५४ सुधारित पदांचा आकृतीबंध मंजूर करण्यात आला व सदर सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर असलेल्या ४५ नियमित पदांच्या ८० टक्के पदे स्थायी करण्यास संदर्भ क्र. ४ येथील दि.१३.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली. सदर दि.१३.१०.२०२२ चा शासन निर्णय दि.१५.११.२०२२ रोजीपासून अंमलात आणण्याबाबत संदर्भ क्र. ५ येथील दि.०३.११.२०२२ च्या शुद्धीपत्रकान्वये मंजुरी देण्यात आली. त्यानुसार पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील (खुद्द) ५४ पदांपैकी ०९ अस्थायी पदे + ०५ (अधिसंख्य पदे- शिपाई संवर्गातील ७ पैकी ५ कार्यरत पदे) अशा एकूण १४ पदांना वित्त विभागाच्या दि.१८.०८.२०२२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार तसेच या विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील दि.१४.११.२०२२ च्या शासन निर्णयानुसार दि.१५.११.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास आली. आता, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.७ येथील दि.०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील (खुद्द) ५४ पदांपैकी ०९ अस्थायी पदे + ०५ (अधिसंख्य पदे- शिपाई संवर्गातील ७ पैकी ५ कार्यरत पदे) अशा एकूण १४ पदांना दि.०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** :

वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.७ येथील शासन निर्णयातील तरतुदींनुसार पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील मंजूर ५४ पदांपैकी ०९ अस्थायी पदे + ०५ (अधिसंख्य पदे- शिपाई संवर्गातील ७ पैकी ५ कार्यरत

पदे) अशा एकूण १४ पदांना दि.०१.०३.२०२३ ते ३१.०८.२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **सुधारित आकृतीबंध** | **सुधारित आकृतीबंधानुसार स्थायी अस्थायी पदांचे विवरण** | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | **स्थायी** | **अस्थायी** | **एकूण** |
| १. | सचिव | ०१ | ०१ | ०० | ०१ |
| २. | उप सचिव | ०३ | ०३ | ०० | ०३ |
| ३. | अवर सचिव | ०४ | ०४ | ०० | ०४ |
| ४. | कक्ष अधिकारी | ०६ | ०५ | ०१ | ०६ |
| ५. | उच्च श्रेणी लघुलेखक (इंग्रजी / मराठी) | ०५ | ०४ | ०१ | ०५ |
| ६. | निम्नश्रेणी लघुलेखक | ०१ | ०१ | ०० | ०१ |
| ७. | सहायक कक्ष अधिकारी | ११ | ०८ | ०३ | ११ |
| ८. | रोखलेखापाल | ०१ | ०१ | ०० | ०१ |
| ९. | लघुटंकलेखक (मराठी) | ०१ | ०० | ०१ | ०१ |
| १०. | लिपिक टंकलेखक | १० | ०७ | ०३ | १० |
| ११. | रोखपाल | ०१ | ०१ | ०० | ०१ |
| १२. | देयक लिपिक | ०१ | ०१ | ०० | ०१ |
| १३. | वाहन चालक | ०२ | बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा | | |
| १४. | शिपाई | ०७ | बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा | | |
| | **एकूण** | **५४** | **३६** | **०९** | **४५** |

२. सुधारित आकृतीबंधामध्ये उपरोक्त विवरणपत्रातील अ.क्र.१३ ते १४ येथील पदे "मृत संवर्ग" म्हणून घोषित करण्यात आली असून, सदर संवर्गात सध्या जेवढे कर्मचारी कार्यरत असतील तेवढी पदे अधिसंख्य समजण्यात येऊन, अधिसंख्य म्हणून ठरविण्यात आलेल्या पदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती किंवा अन्य कारणामुळे ते पद रिक्त झाल्यानंतर सदरचे पद आपोआप रद्द होईल.

३. उपरोक्त पदांसाठी होणारा खर्च २२५१ - सेक्रेटरीएट सामाजिक सेवा (००) ०९० सेक्रेटरीएट (०१)(०१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग ( २२५१०६३२) (०१) वेतन, मागणी क्रमांक झेडडी - १ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३०११४५३१८६२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.03.03 14:40:47 +05'30'

**( सुमंत दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.(रोख शाखेमार्फत)

३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

४) अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई

५) अवर सचिव(समन्वय), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई

६) निवड नस्ती, आस्थापना.